नाशिक महानगरपालिका
**श्री.ए. एल. उमाळे, शहर अभियंता यांचा स्वेच्छा सेवानिवृत्तीची नोटीस नामंजूर करण्याबाबत महानगरपालिका महासभेने केलेला ठराव क्र.२८१, दि.३०.३.२०१० निलंबित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र.नामपा-१९१०/५०८/प्र.क्र.७७/१०/नवि-२५
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- २३ जून ,२०१०

**पहा :-** १) आयुक्त, नाशिक महानगरपालिका,नाशिक यांचे पत्र क्र.आस्था./वशि/९०६/२०१०, दिनांक १९.५.२०१० अन्वये शासनास सादर केलेला अहवाल.
२) नाशिक महानगरपालिका ठराव क्र. २८१ दिनांक ३०.३.२०१०.
३) आयुक्त, नाशिक महानगरपालिका,नाशिक यांचे पत्र क्र.आस्था./वशि/६२९/२०१०, दिनांक १९.४.२०१०.

**प्रस्तावना -** श्री.ए. एल. उमाळे, शहर अभियंता,नाशिक महानगरपालिका यांनी दि.८.१२.२००९ रोजी ३ महिन्यांची स्वेच्छा निवृत्तीची नोटीस आयुक्त, नाशिक महानगरपालिका यांना दिली होती. सदर नोटीसीवरील निर्णयासाठी प्रस्ताव महासभेपुढे दि. ८.२.२०१० रोजी ठेवण्यात आला. सदर नोटीसी संदर्भात आयुक्त,नाशिक महानगरपालिका यांनी दिनांक ५.३.२०१० च्या पत्रान्वये श्री.उमाळे यांच्या स्वेच्छानिवृत्तीच्या नोटीसीवरील निर्णय महासभेच्या निर्णयासाठी प्रलंबित असल्याचे श्री. उमाळे यांना कळविले होते. आयुक्त, नाशिक महानगरपलिका यांचे दि. ५.३.२०१० रोजीचे पत्र स्पीड पोस्टाने दिनांक ६.३.२०१० रोजी श्री.उमाळे यांना पाठविण्यात आले. सदरचे पत्र श्री. उमाळे यांनी दिनांक १०.३.२०१० रोजी स्विकारले असल्याचे अभिलेखातील नोंदीवरुन दिसून येते. नाशिक महानगरपालिकेच्या महासभेने ठराव क्र. २८१ दि. ३०.३.२०१० अन्वये शहर अभियंता श्री. अरुण उमाळे यांच्या सेवेची मनपास आवश्यकता आहे यास्तव श्री. उमाळे यांचा आयुक्तांनी सादर केलेला दि. ८.२.२०१०चा स्वेच्छा सेवानिवृत्तीचा प्रस्ताव १९४९ चे कलम ५३ अन्वये नियुक्ती प्राधिकरण म्हणून महासभा नामंजूर करीत आहे. आयुक्त यांनी नियमानुसार कार्यवाही करुन शहर अभियंता श्री. उमाळे यांना मनपा सेवेत तात्काळ रुजू करुन घेण्यास मंजूरी देण्यात येत आहे, असा निर्णय घेतला आहे. सदर ठरावाच्याअनुषंगाने आयुक्त, नाशिक महानगरपालिका,नाशिक यांनी पत्र क्र.आस्था./वशि/६२९/२०१०, दिनांक १९.४.२०१० अन्वये श्री. ए.एल.उमाळे यांना कळविले होते. त्यानुसार श्री. ए.एल.उमाळे हे शहर अभियंता या पदावर दि.१९.४.२०१० रोजी रुजू झाले आहेत.

नाशिक महानगरपालिकेने त्यांच्या सेवेतील कर्मचारी/अधिकारी यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ चे नियम लागू केलेले आहेत.

स्वेच्छानिवृत्तीसंदर्भात महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम ,१९८२ मधील नियम ६६ खालीलप्रमाणे आहे-

१) शासकीय कर्मचा-याला त्याची २० वर्षाची अर्हताकारी सेवा पूर्ण झाल्यानंतर नियुक्ती प्राधिका-यास तीन महिन्याची लेखी नोटीस देऊन सेवेमधून केव्हाही सेवानिवृत्त होता येईल.

२) स्वेच्छेने सेवानिवृत्त होण्याबद्दल पोटनियम (१) खाली दिलेली नोटीस, नियुक्ती प्राधिका-याने स्वीकारणे आवश्यक असेल

मात्र, उपरोक्त नोटिसीमध्ये नमूद केलेला कालावधी संपण्यापूर्वी नियुक्ती प्राधिका-याने सेवानिवृत्तीसाठी परवानगी देण्यास नकार दिला नाही तर, त्याकालावधीच्या समाप्तीच्या तारखेपासून सेवानिवृत्ती अंमलात येईल.

श्री. उमाळे यांनी आयुक्त, नाशिक महानगरपालिका यांना दिनांक ८.१२.२००९ रोजी स्वेच्छानिवृत्तीची नोटीस दिलेली होती. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम, १९८२ मधील ६६ (२) मधील तरतुदीनुसार सदर नोटीसीचा कालावधी दि. ७.३.२०१०(म.नं.) रोजी संपुष्ठात आला आहे. नाशिक महानगरपालिकेने श्री. उमाळे यांच्या नोटीसीवर त्यांची सेवानिवृत्ती दि. ७.३.२०१० पूर्वी नाकारली नसल्याने महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम, १९८२ मधील ६६ (२) प्रमाणे श्री.उमाळे दिनांक ७.३.२०१० (मध्यान्होत्तर) सेवानिवृत्त झालेले आहेत. श्री. उमाळे हे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम, १९८२ मधील ६६ (२) मधील तरतुदीनुसार दि.७.३.२०१० (म.नं.) पासून सेवानिवृत्त ठरत असताना नाशिक महानगरपालिकेच्या महासभेने केलेला ठराव क्र. २८१, दि. ३०.३.२०१०, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियंम, १९८२ मधील ६६ (२) मधील तरतुदीशी विसंगत आहे. त्यामुळे मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ मधील कलम ४५१(१) अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारात नाशिक महानगरपालिका ठराव क्र.२८१ दिनांक ३०.३.२०१० निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

पूर्ववर्ती विवेचनाच्याअनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**-नाशिक महानगरपालिका महासभेने श्री.ए.एल.उमाळे यांच्या स्वेच्छानिवृत्ती संदर्भात पारित केलेला ठराव क्र. २८१, दिनांक ३०.३.२०१० मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ४५१ (१) अन्वये निलंबित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स्मिता द. मंत्री)
सह सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
सचिव (नवि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
महापौर, नाशिक महानगरपालिका, नाशिक.
आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक (३ प्रती)
कक्ष अधिकारी, नवि-२९, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. (वेबसाईटवर प्रसिध्दीकरीता)
निवड नस्ती (नवि-२५)